आषाढी एकादशीनिर्मित्त देहू ते पंढरपूर तसेच आंळदी ते पंढरपूर या दोन पालखीमार्गावर विविध माध्यमांव्दारे आपत्ती व्यवस्थापन विषयक जनजागतीकरीता प्रसिध्दी माध्यम आराखड्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
## (आपत्ती व्यवस्थापन प्रभाग)
## शासन निर्णय क्रमांकः आव्यप्र-२०२४/प्र.क्र.८२/आव्यप्र-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, १ ला मजला,
मंत्रालय मुख्य इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक :- २९ जून, २०२४

**वाचा**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक मावज-२०१८/प्र.क्र.२३९/कार्यासन-३४, दिनांक २६.०३.२०२०
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक मावज/२०२१/प्र.क्र.१२६/कार्यासन-३४, दिनांक १३.०८.२०२१
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक मावज-२०२३/प्र.क्र.१८७/का-३४/, दिनांक २३.११.२०२३

**प्रस्तावना**

आषाढी एकादशी निमित्त दरवर्षी पंढरपूर येथे मोठी यात्रा भरते. सदर यात्रेला प्रदिर्घ संत परंपरा लाभलेली आहे. महाराष्ट्र तसेच इतर राज्यामधून लाखोंच्या संख्येने भाविक महाराष्ट्राचे आराध्यदैवत श्री. विठ्ठलाच्या दर्शनासाठी पायी वारी करून पंढरपूर येथे दाखल होतात. आषाढी एकादशीनिर्मित्य दरवर्षी देहू ते पंढरपूर व आळंदी ते पंढरपूर या दोन्ही पालखी मार्गावरुन श्री. संत ज्ञानेश्वर महाराज व जगतगुरु तुकाराम महाराज यांच्या पालखींमध्ये लाखो वारकरी पायी वारीमध्ये सहभागी होवून श्री. विठ्ठल दर्शनाकरीता पंढरपूरकडे प्रस्थान करतात. सद दोन्ही पालख्या पंढरपूरकडे मार्गक्रमण करत असतांना राज्यभरातून अनेक छोट्या-मोठ्या दिंड्या या पालख्यांमध्ये सहभागी होत असतात. आषाढी पायीवारीमध्ये सुमारे २० ते २५ लाख भाविक दरवर्षी सहभागी होतात. आषाढी वारीनिर्मित्य प्रस्थान करणाऱ्या पालख्या साधारणपणे २० ते २२ दिवसांच्या कालावधीत पंढरपूर येथे पोहचतात. सदर कालावधीत शासनाच्या विविध विभागांकडून राबविण्यात येणाऱ्या कल्याणकारी योजना व उपक्रमांबाबत विविध माध्यमांव्दारे जनजागृती करण्यात येते. सदर बाब विचारात घेवून आषाढी वारी निर्मित्त देहू ते पंढरपूर व आळंदी ते पंढरपूर या दोन पालखी मार्गावर पालख्यांमध्ये सहभागी होणाऱ्या भाविकांमध्ये तसेच राज्यातील नागरीकांमध्ये

राज्यात उद्भवणाऱ्या विविध नैसर्गिक तसेच माननिर्मित आपत्तीसंदर्भात चित्ररथ, एलईडी बसविलेले वाहन, पथनाट्य व इतर अनुषंगिक प्रकाशने अशा विविध माध्यमांच्या सहाय्याने जनजागृती करण्यासाठी तयार करण्यात आलेल्या माध्यम आराखड्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

आषाढी वारी निर्मित्त देहू ते पंढरपूर व आळंदी ते पंढरपूर या दोन पालखी मार्गावर पालख्यांमध्ये सहभागी होणाऱ्या भाविकांमध्ये तसेच राज्यातील नागरीकांमध्ये राज्यात उद्भवणाऱ्या विविध नैसर्गिक तसेच माननिर्मित आपत्तीसंदर्भात आषाढी वारी कालावधीत चित्ररथ, एलईडी बसविलेले वाहन, पथनाट्य व इतर अनुषंगिक प्रकाशने अशा विविध माध्यमांच्या सहाय्याने जनजागृती करण्यासाठी तयार करण्यात आलेल्या खालील माध्यमाव्दारे प्रसिध्दी करण्याकरीता संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक १ व २ मधील तरतुदीनुसार प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | माध्यम | तपशिल | अंदाजे खर्च |
|---|---|---|---|
| १ | चित्ररथ, एलईडी बसविलेले वाहन, पथनाट्य व इतर अनुषंगिक प्रकाशने | सामान्य प्रशान विभाग, शासन निर्णय क्रमांक मावज-२०२३/प्र.क्र.१८७/का-३४/, दिनांक २३.११.२०२३ अन्वये नियुक्त संस्थांच्या सूचीमधील संस्थांकडून विहित कार्यपध्दतीचा अवलंब करून कार्यवाही करण्यात यावी. | ३,२२,३६,०००/- |
| २ | लोकराज्य मासिक माध्यमातून प्रसिध्दी | - | ३,००,०००/- |
| | **एकूण** | | **३,२५,३६,०००/-** |
| | संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक २ नुसार प्रशासकीय खर्च (५ कोटी इतक्या रकमेपर्यंत एकूण खर्चाच्या ४% मर्यादेत) | | ६,६४,०००/- |
| एकूण एकंदर अपेक्षीत खर्च | | | **३,३२,००,०००/-** |

०२. उपरोक्त नमूद प्रसिध्दीची कार्यवाही ही सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक २ येथील दिनांक १३.०८.२०२१ मधील तरतुदीनुसार माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत करण्यात यावी.

०३. प्रसिध्दीकरीता विहित कार्यपध्दतीचा अवलंब करून माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत निवड करण्यात आलेल्या संस्थेकडून उपरोक्तपैकी अ.क्र.१ येथे नमूद करण्यात आलेल्या प्रसिध्दीची कार्यवाही ही आषाढी वारी कालावधीत माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाकडून निर्गमित करण्यात

येणाऱ्या कार्यादेशातील अटी-शर्तीनुसार करण्यात यावी. तसेच प्रसिध्दीसंदर्भातील आवश्यक सर्व पुरावे सादर करण्याची जबाबदारी संबंधीत संस्थेची राहील. तसेच उपरोक्त माध्यमाव्दारे प्रसिध्दी करतांना राज्य व केंद्र शासनाने अधिसुचित केलेल्या आपत्तींबाबत, (राज्यात उदभ्वणाऱ्या आपत्ती- चक्रिवादळ, दुष्काळ, आग, पुर, गारपीठ, दरड कोसळणे, ढगफुटी, टोळधाड, अवेळी पाऊस, अतिवृष्टी, वीज कोसळणे, समुद्राचे उधान, सततचा पाऊस, उष्माघात इ.) राज्य शासनाकडून वेळोवेळी करण्यात येणाऱ्या उपाययोजना, घेण्यात आलेले धोरणात्मक निर्णय तसेच प्रचलित नियमानुसार करण्यात येणारी मदत याबाबत जनजागृती व प्रसिध्दी करण्यात यावी.

०४. ज्या संस्थेकडून उपरोक्त नमूद प्रसिध्दीची कार्यवाही करण्यात येणार आहे त्या संस्थेकडून खालील बाबींची पूर्तता करणे बंधनकारक करण्यात यावे.

अ) अनुक्रमांक १ मध्ये नमुद केलेल्या प्रसिध्दीसाठी निर्मिती करण्यात येणारा (दृक श्राव्य) मजकूर माहितीपट, व्हिडिओ व इतर अनुषंगिक निर्मिती यावर विभागाचे मालकी हक्क असल्याने त्याची Soft Copy या विभागास सादर करणे बंधनकारक राहील.

आ) सदर प्रसिध्दीसंदर्भातील ठिकाणांचे Geo Tagging Photo विभागास सादर करणे आवश्यक राहील. प्रसिध्दीसंदर्भातील कार्यक्रमाची व्हिडीओग्राफी करण्यात यावी. त्यात दिनांक व वेळ असणे आवश्यक राहील.

इ) उपरोक्त माध्यम आराखडयासंदर्भातील देयके ही माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत निर्गमित करण्यात येणाऱ्या कार्यादेशातील अटी-शर्तीनुसार विहीत प्रचलित कार्यपद्धती प्रमाणे करण्यासाठी या विभागाकडे सादर करावित. त्यासाठी लेखाधिकारी आव्यप्र-६ यांना आहरण व संवितरण अधिकारी तर वित्तीय सल्लागार व सह सचिव यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

०५. या बाबीवर होणारा खर्च मागणी क्रमांक सी- ६, ८०, सर्वसाधरण, ००१, संचालन व प्रशासन (०१) महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, (०१)(०१) महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकारणाचे कार्यालय स्थापन करणे तसेच फर्निचर व साधनसामुग्रीसह सुसज्जीकरण करणे (कार्यक्रम) लेखाशिर्ष क्रमांक (२२४५१७६१) २६-जाहिरात व प्रसिध्दी या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षाकरीता उपलब्ध असलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

०६. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५ अन्वये निर्गमित वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग चार, अनुक्रमांक-११ अन्वये विहित केलेल्या अटींच्या अधीन राहून, विभागास प्राप्त अधिकार, नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक -२०७७,

दिनांक १८.०६.२०२४ आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २४१/२०२४/व्यय-९ दिनांक २१.०६.२०२४ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या मान्यतेस अनुसरून, निर्गमित करण्यात येत आहे.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०६२९१६४५०२५३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

HITENDRA
YADAORAO DUFARE

Digitally signed by HITENDRA YADAORAO DUFARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=1170c73752038d1c4f8b3a8c1729f3f55bd8bd13206eed4aead71a63b3f1dcee, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=02BBA6FFE202C222698F7E91A562A124096291549EBA836EE89EC11CB9F688D5, cn=HITENDRA YADAORAO DUFARE
Date: 2024.07.01 18:47:26 +05'30'

( हितेंद्र दुफारे )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन, मंत्रालय, मुंबई.
२. महासंचालक , माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागूपर.
४. महालेखापाल, लेखा परिक्षा, १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागूपर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई, निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
६. सहसचिव व वित्तीय सल्लागार. आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
७. लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग (आव्यप्र-६), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव, (वित्त विभाग) यांचे स्वीय सहाय्यक.
९. प्रधान सचिव (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०.संचालक, आपत्ती व्यवस्थापन विभाग, यांचे स्वीय सहाय्यक.
११.निवडनस्ती आव्यप्र-१.